वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या. यांस सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता भागभांडवली अंशदानाची तरतूद वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.

महाराष्ट्र शासन

इतर मागास बहुजन कल्याण विभाग,

शासन निर्णय क्रमांक : वनाम-२०२५/प्र.क्र.२८/महामंडळे

मोती महल, खोली क्र.२, २ रा मजला,

१९५ जे.टाटा मार्ग, चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.

दिनांक : ३० मार्च, २०२५.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७/०३/२०२५

२) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. वनाविजाभज २०२४-२५ / अधि.भाग.भां.वाढ / प्र.क्र.२४ / वि. व ले., दिनांक १७/०३/२०२५.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता लेखाशीर्ष ४२२५ १९२२ या बाबीखाली मंजूर रु.९२,७४,०००/- (अक्षरी रुपये ब्यान्नव लाख चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतकी रक्कम खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच, ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. शासनाने विहित केलेल्या कार्यपद्धतीचा अवलंब केल्याची खातरजमा करूनच सदर खर्च कण्यात यावा.
३. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
४. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

५. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

६. महामंडळाने कर्जाच्या वसूलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.

७. सदर योजनेचा निधी हा उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

८. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

९. संदर्भ क्र.१ येथे नमूद परिपत्रकातील परिच्छेद ५ चे अनुपालन महामंडळाकडून करण्यात यावे.

**२.** वरील अनुदानाबाबत उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे "नियंत्रक अधिकारी" राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी लेखा अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान महाराष्ट्र कोषाधिकार नियम, १९६८ मधील नियम ४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई यांस सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे ५४, गुंतवणुका हे सशर्त सहायक अनुदान आहे.

**३.** या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी-४, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणुका (०१) भागभांडवली अंशदान, (०१) (०१) वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (आणि विशेष मागास प्रवर्गासाठी योजना) (कार्यक्रम) ५४, गुंतवणुका (४२२५ १९२२) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**४.** हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२४ / प्र.क्र.८० / अर्थ-३, दिनांक १७.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४६६/२०२५, दिनांक २९.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३३०१७४५२०४८३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.30 17:45:57 +05'30'

**( र. रा. पेटकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखापरीक्षा / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४ / अर्थोपाय / अर्थसंकल्प-३/ साउ) मंत्रालय, मुंबई.
७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
८) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) लेखा अधिकारी (रोख शाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (महामंडळे).